(३५)

४१

**प्रशासकीय मान्यता**
चांदूर बाजार, जि.अमरावती येथे तालुका न्यायालयाची इमारत बांधण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीरीबी-१२०९/८६९/प्र.क्र.१३४/का-१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:-३ जून,२०१०.

पहा :- १) प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे-दोन), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यू)१९१०/१९८६, दिनांक ६ नोव्हेंबर, २००९.
२) प्रमुख जिल्हा न्यायाधिश, अमरावती यांचे पत्र क्र.बी/डब्ल्यू-५३६४/२००९, दि. ३१.८.२००९

शासन निर्णय :- चांदूर बाजार, जि.अमरावती येथे तालुका न्यायालयाची इमारत बांधण्याच्या रु. ३,२०,७७,१००/- (रुपये तीन कोटी वीस लक्ष सत्त्याहत्तर हजार शंभर फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अनुक्रमांक | तपशिल | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकामाचा खर्च | २,६०,९५,४०० |
| २ | आकस्मिक खर्च (४%) | ८,३१,६०० |
| ३ | पाणीपुरवठा (८ %) | १६,६३,२०० |
| ४ | विद्युतीकरण ( ११%) | २२,८६,९०० |
| ५ | जनरेटर सिस्टीम. | ५,००,००० |
| ६ | ११K.V. लाईन सर्व्हिस लाईन शिफ्टींग शुल्क (एम.एस.ई.बी.). | ७,००,००० |
| | एकूण | ३,२०,७७,१०० |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.
(अ) काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करण्यात यावी.
(ब) मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांचेकडून मंजूर करुन घेऊनच काम सुरु करावे.
(क) अंतर्गत रस्ते, संरक्षक भिंत इत्यादी कामांची मापे छेद नकाशासह अंदाजपत्रकात अंतर्भूत करुनच काम सुरु करावे.

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-०५१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-८३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-११८/इमा-२, दिनांक:- १९ मार्च,२०१० अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. :-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे,२००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण-दोन), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अमरावती,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती,
कार्यकारी अभियंता, विशेष प्रकल्प(सार्वजनिक बांधकाम) विभाग, अचलपूर, जि.अमरावती, (मुळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, चांदूर बाजार, जि.अमरावती,
जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, बी-२३/१, साऊथ अंबाझरी रोड, अंध विद्यालयाजवळ, नागपूर,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
कक्ष अधिकारी, का. ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.